**कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१७/७५/प्र.क्र.२२/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२/०६/२०१७

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे आदेश क्र. पुनर्व/कावि-४/१२/२०१२, दि. ०३/०२/२०१२
७) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/कावि-५/७०/२०१७, दि. २३/०३/२०१७
८) कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांचे पत्र क्र. कोधव्यविको/प्रशा-२/१८०६/२०१७ दि. ११/०४/२०१७
९) कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांचे पत्र क्र. कोधव्यविको/ प्रशा-२/२०७८/२०१७ दि. २६/०४/२०१७

प्रस्तावना -

कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांनी संदर्भाधिन क्र. ८ व ९ येथील पत्रान्वये कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील विभागीय आयुक्त, पुणे यांचे स्तरावरुन मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास्तव प्रस्ताव सादर केला आहे. याबाबत प्रकल्पांतर्गत पाटण तालुक्यातील नागरी सुविधा कामांना विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ६ येथील आदेशान्वये रु. १,७३,०५,२७८/- एवढया रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, मूळ प्रशासकीय मान्यतेनुसार निविदेकरिता प्राप्त शिफारशीदरम्यान बिटूमनचे दर वाढल्याने, खुल्या निविदा बोलाविण्यात आल्या. तथापि, सदर निविदा प्रक्रियेदरम्यान अधिक किंमतीच्या निविदा प्राप्त झाल्याने प्रचलित सन २०१२-२०१३ च्या दरसुचीनुसार प्रकल्प अधिकारी यांनी अंदाजपत्रकीय किंमती अद्ययावत करुन निविदा स्वीकृत केल्या असून, तदनुषंगाने सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान अधिकारानुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ६ परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला सुधारित प्रशासकीय मान्यता

करण्यासंदर्भात सुधारित अंदाजातील अधिक्य मुळ मंजूर अंदाजित खर्चाच्या १५ % मर्यादेत असल्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास अधिकार आहेत. सदर अधिकारानुसार, विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ६ च्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

**त्यानुसार, कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद नागरी सुविधांच्या १५ कामांच्या एकूण रू. १,९८,७९,३९०/- (अक्षरी रूपये एक कोटी अठ्ठयाण्णव लक्ष एकोशऐंशी हजार तीनशे नव्वद फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

२ कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांनी मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल (Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१७-२०१८ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार "मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०२१५१५१७९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.06.02 15:20:29 +05'30'

**(प्रविण रा. मुंढे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३.जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक सातारा
४.अधिक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा
५.कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर
६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
९.उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) सातारा
१०.जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१३.महसूल व वन विभाग, ब-१, पीएसी कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१७/७५/प्र.क्र.२२/र-८ दि. ०२/०६/२०१७ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण १५ नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ. क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | सुधारित अंदाजपत्र कीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | ढोकावळे-रीसवड | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.२ | १७,०१,५०४/- |
| २ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.६ | १७,१०,०२९/- |
| ३ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.७ | १७,१२,९७१/- |
| ४ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.८ | १७,१४,६९७/- |
| ५ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.२ | १७,६०,७१५/- |
| ६ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.३ | १७,०२,६६४/- |
| ७ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.४ | १७,०५,५६४/- |
| ८ | बाजे (व.स.) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.५ | १७,०८,१९३/- |
| ९ | चिरंबे-विहे | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.१ | ८,२५,८९१/- |
| १० | किसरुळे-मेंढेघर | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे | १७,१६,७०५/- |
| ११ | किसरुळे शिवंदेश्वर (भराडवस्ती) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे | |
| १२ | किसरुळे शिवंदेश्वर (माने वस्ती) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे | |
| १३ | किसरुळे-बोपोली (दवंडे वस्ती) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे | १९,५३,७७०/- |
| १४ | किसरुळे बोपोली (लाड वस्ती) | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे | |
| १५ | किसरुळे-ढाणकल | पोहोच रस्ता डांबरीकरण करणे कि.मी. क्र.३ | १६,६६,६८७/- |
| | | एकूण | **रु.१,९८,७९,३९०/** |

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.06.02 15:20:41 +05'30'

**(प्रविण रा. मुंढे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**